पोलीस अधीक्षक, पालघर यांच्या कार्यालयासाठी निर्माण केलेली १५० अस्थायी पदे व पालघर पोलीस मुख्यालयासाठी निर्माण केलेल्या १०३ अस्थायी पदांच्या आवर्ती व अनावर्ती खर्चाच्या निधी वितरणाबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

### शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-०३१५/प्र.क्र.१२२/पोल-३

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२

दिनांक: ६ ऑक्टोंबर २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक: एपीओ-०३१४/प्र.क्र.४७/पोल-३,दि.२२.०४.२०१५

२) शासन शुध्दीपत्रक, गृह विभाग क्रमांक: एपीओ-०३१४/प्र.क्र.४७/पोल-३, दि.१६.०५.२०१५

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३, दि.०१.०८.२०१५

**प्रस्तावना -**

दि. १ ऑगस्ट २०१४ पासून पालघर जिल्हा निर्माण करण्यात आला आहे. संदर्भाधीन क्र. १ वरील दि.२२.०४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये पोलीस अधिक्षक, पालघर यांच्या कार्यालयासाठी १५० अस्थायी पदे व पालघर पोलीस मुख्यालयातील विविध शाखांसाठी १०३ अस्थायी पदे निर्माण करण्यात आली आहेत. त्यासाठी येणाऱ्या आवर्ती खर्च रु. १२,४३,४२,२८४/- व अनावर्ती खर्च रु.१,८१,७०,२७९/- इतका खर्च राज्य मंत्रीमंडळाने ठाणे जिल्ह्याचे विभाजन करुन नवीन पालघर जिल्हा निर्माण करण्यासाठी मंजूर केलेल्या खर्चातून मागणी क्र. बी-१, २०५५- पोलीस , (००) १०९ जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस दल, (दत्तमत) (२०५५ ०१६८) या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर खर्च भागविण्यासाठी सन २०१५ च्या पावसाळी अधिवेशनात लाक्षणिक पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. ते महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१५ (सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-२३) म्हणुन महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि. ३०.०७.२०१५, यामध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे. त्यानुसार निधीचे वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

संदर्भाधीन क्र. १ वरील दि. २२.०४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये पोलीस अधिक्षक, पालघर यांच्या कार्यालयासाठी १५० अस्थायी पदे व पालघर पोलीस मुख्यालयातील विविध शाखांसाठी १०३ अस्थायी असे एकुण २५३ पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर अस्थायी पदांचा आवर्ती व अनावर्ती खर्च भागविण्यासाठी मा. मंत्रीमंडळाने व विधिमंडळाने मंजूर केल्यानुसार आणि महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिकार, २०१५ (सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग ४, दि. ०३.०७.२०१५ मध्ये प्रसिध्द केल्यानुसार आवर्ती खर्च रु.१२,४३,४२,२८४/- व अनावर्ती खर्च रु. १,८१,७०,२७९/- इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदरहू निधी पालघर जिल्ह्यासाठी नव्याने निर्माण करण्यात आलेली २५३ पदे तात्काळ भरण्याच्या अधीन मंजूर करण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस (००) १०९ जिल्हा पोलीस (००)(०१)जिल्हा पोलीस दल (दत्तमत) (२०५५ ०१६८) या लेखाशिर्षाखालील आवर्ती खर्च ०१- वेतन व अनावर्ती खर्च १३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टांखाली विधानमंडळाच्या जुलै-२०१५ च्या पावसाळी अधिवेशनात बाब क्रमांक-१४ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या सन २०१५-१६ च्या पूरक अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र. ३९४/१५/व्यय-७, दि. २१.०८.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००६१७४०२१७२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.10.06 17:40:56 +05'30'

(द. ह. कदम)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य.
३. विशेष पोलीस महानिरिक्षक, कोकण परिक्षेत्र, नवी मुंबई.

४. पोलीस अधीक्षक, पालघर/ठाणे

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, नागपूर.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/ठाणे.

१०.अवर सचिव (का.अर्थसं-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

११.वित्त विभाग, व्यय-७ / अर्थ-३, मंत्रालय, मुंबई.

१२.निवड नस्ती/पोल-३.